**जलसंपदा विभागातील अभियंत्यांच्या**
**प्रशिक्षणाबाबत मार्गदर्शक सूचना..**

**महाराष्ट्र शासन**
जलसंपदा विभाग
शासन परिपत्रक क्रमांक प्रशिक्षण-२०१०/(२६/२०१०)/आ (प्रशि)
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : १४ जानेवारी, २००९.

**प्रस्तावना**

जलसंपदा विभागातील अभियंत्यांना, त्यांच्या एकूण सेवा कालावधीच्या ३ टक्के कालावधी प्रशिक्षणात व्यतीत करणे बंधनकारक आहे. नित्य नवीन शोध लागत असतात. तंत्रज्ञानात सतत सुधारणा होत असतात. त्याचे ज्ञान जलसंपदा विभागातील अभियंत्यांना मिळून त्यांची कार्यक्षमता वाढावी, त्यांनी आपली कामे/कर्तव्य व्यवस्थित पार पाडावे आणि त्याचा लाभ शेतकरी, पर्यायाने समाजाला व्हावा म्हणून जलसंपदा विभागाच्या जल व भूमी व्यवस्थापन संस्था, औरंगाबाद आणि अभियांत्रिकी अधिकारी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक या प्रशिक्षण संस्था निरंतर कार्यरत आहेत. या संस्थांतील प्रशिक्षण कार्यक्रमाप्रमाणे राष्ट्रीय पातळीवर/राज्याबाहेरील अन्य प्रशिक्षणाचे महत्व व उपयुक्तता विचारात घेऊन अशा प्रशिक्षणासाठीसुध्दा जलसंपदा विभागातील अभियंत्यांना पाठविण्यात येते. प्रकल्प उभारणीतील प्रशिक्षित मनुष्यबळाचे महत्व विचारात घेऊन जलविज्ञान प्रकल्प टप्पा क्र.२ मध्ये मोठया प्रमाणात प्रशिक्षणाचा अंतर्भाव केला आहे. या प्रशिक्षणासाठीही जलविज्ञान प्रकल्पातील अभियंत्यांना पाठविण्यात येते. शासनाच्या काटकसरीच्या धोरणानुसार आणि प्रशिक्षणाचा दर्जा व गुणवत्ता राखण्यासाठी वरिष्ठ स्तरावरील अधिकाऱ्यांचा सहभाग प्रशिक्षण कार्यक्रमात वाढविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**परिपत्रक**

शासन निर्णय, वित्त विभाग क्र. बीजीटी १०००/प्र.क्र.५६/२०००/वित्तीय सुधारणा, दि.१०/९/२००१ च्या काटकसरीच्या धोरणात, शासनाच्या प्रशिक्षण संस्थामध्येच प्रशिक्षण देण्यात यावे, असे नमूद केले आहे. यास्तव, या धोरणाचा विचार करून, राष्ट्रीय पातळीवर/राज्याबाहेरील प्रशिक्षणासाठी फक्त, कार्यकारी अभियंता व त्यावरील अधिकाऱ्यांचे नामनिर्देशन करण्यात यावे. तसेच उप अभियंता व त्याखालील अभियंते, तांत्रिक सहाय्यक. इत्यादींचे नामनिर्देशन, जल व भूमी व्यवस्थापन संस्था, औरंगाबाद आणि अभियांत्रिकी अधिकारी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक या संस्थेमार्फत आयोजित प्रशिक्षण वर्गासाठी करण्यात यावे.

२. उपरोक्त शासन निर्णयातील काटकसरीच्या धोरणानुसार, जलविज्ञान प्रकल्प टप्पा क्र.२ संदर्भातील प्रशिक्षणासाठी कार्यकारी अभियंता व त्यावरील अधिकाऱ्यांचे नामनिर्देशने शासन स्तरावर मान्यतेसाठी सादर करावीत. सदर प्रशिक्षण घेतलेल्या जलविज्ञान प्रकल्पातील कार्यकारी अभियंता व त्यावरील अधिकाऱ्यांनी, सदर प्रशिक्षणाचा लाभ, जलविज्ञान प्रकल्पाशी संबंधीत उप अभियंते व त्यांच्या खालील स्तरावरील अभियंते/अभियांत्रिकी सहाय्यक यांना देण्यासाठी, अभियांत्रिकी अधिकारी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक या संस्थेच्या सहाय्याने, संबंधीत उप अभियंते व त्यांच्या खालील स्तरावरील अभियंते/अभियांत्रिकी सहाय्यक यांच्यासाठी प्रशिक्षण आयोजित करण्यात यावे. सदर प्रशिक्षणासाठी जागतिक बँकेचा निधी वापरणे शक्य असल्यास तो निधी प्राधान्याने उपयोगात आणावा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१००११४१४२५२३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( शुभांगी आगाशे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
महासंचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशित.
महासंचालक, जल व भूमी व्यवस्थापन संस्था, औरंगाबाद.
सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग.
सर्व मुख्य अभियंता / सर्व अधीक्षक अभियंता,जलसंपदा विभाग.
सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सह सचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अधीक्षक अभियंता व उपसचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
सर्व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
संगणक कार्यक्रम कक्ष , जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यासन आस्थापना (प्रशिक्षण), संग्रहार्थ
निवड नस्ती धारिका.